**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) हिंगोली जिल्हयातील हिंगोली शहर येथे सद्भाव मंडप बांधकामासाठी मान्यताप्राप्त अनुदान वितरीत करण्याबाबत (केंद्र हिस्सा+राज्य हिस्सा) सन २०१८-१९.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१८/प्र.क्र.९३/का.७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - १३ फ़ेब्रुवारी, २०१९

**संदर्भ:** - १. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/१२२/२०१८-MsDP-MOMA, दि १०/१२/२०१८.
२. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/१५/२०१९-MsDP-MOMA, दि १६/०१/२०१९.
३. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अ.वि.-२०१८/प्र.क्र.९३/ का-७, दि.१३/०२/२०१९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) राज्यातील हिंगोली शहर, जि.हिंगोली येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामाचा रु. १५४.८६ लाख इतका प्रस्ताव मा.मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय संनियंत्रण समितीच्या सहमतीने केंद्र शासनास पाठविण्यात आला होता.

२. केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि.०३/१२/२०१८ रोजी झालेल्या १० व्या बैठकीत हिंगोली जिल्हयातील हिंगोली शहर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी एकूण रु.१४६.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भ क्र. (२) अन्वये कळविण्यात आले आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र. (२) येथील आदेशाद्वारे PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त हिंगोली जिल्हयातील हिंगोली शहर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रु.२६.४० लाख इतकी तरतूद मंजूर/वितरित केली आहे. PMJVK अंतर्गत हिंगोली जिल्हयातील हिंगोली शहर येथे सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र शासनाकडून मंजूर/ वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील अनुक्रमे रु.२६.४० लाख तसेच राज्य हिश्यातील रु.१७.४० लाख अशी एकूण रु.४३.८० लाख इतका निधी जिल्हाधिकारी, हिंगोली यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

३. केंद्र शासनाकडून संदर्भ क्र. (२) येथील आदेशाव्दारे PMJVK अंतर्गत हिंगोली शहर, जि.हिंगोली येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी मंजूर/वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रु.२६.४० लाख तसेच राज्य हिश्यातील रु.१७.४० लाख अशी एकूण रु.४३.८० लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना खालील प्रमाणे वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(Rs. in lakhs)

| Sr. NO. | Name of Projects | Sharing Pattern | Unit | Unit Cost | Central Share | State Share | Total | GOI 1st Installment | GOM 1st Installment |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| | | | | | | | | | |
| 1 | Construction of Sadbhav Mandap at Hingoli City for minorities | 60:40 | 1 | 146.00 | 88.00 | 58.00 | 146.00 | 26.40 | 17.40 |
| | **Total(A)** | | | **146.00** | **88.00** | **58.00** | **146.00** | **26.40** | **17.40** |

४. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(०९) व (१०) प्रमाणे सन २०१८-१९ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत हिंगोली जिल्हयातील हिंगोली शहर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र व राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील रू.४३,८०,०००/- (रुपये त्रेचाळीस लाख ऐंशी हजार फ़क्त) एवढी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

५. सन २०१८-१९ या वर्षात जिल्हाधिकारी, हिंगोली यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(०९) व (१०) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत हिंगोली जिल्हयातील हिंगोली शहर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकामासाठी आहरित केलेली रक्कम सदर विकासकामांच्या अंमलबजावणीशी संबंधित अंमलबजावणी यं्त्रणेस रितसर वितरित करावी.

६. PMJVK अंतर्गत सद्भाव मंडप बांधकामाच्या अंमलबजावणीकरीता संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी मुख्य नियंत्रक अधिकारी व अंमलबजावणी अधिकारी राहतील.

७. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त हिंगोली शहर येथील अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप बांधकाम हे केंद्र शासनाच्या टाईप-१ च्या टाईपप्लॅननुसार तसेच, यासाठीच्या सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेल्या तांत्रिक मंजूरीनुसार सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. प्रस्तुत सद्भाव मंडप बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देण्याबाबत आदेश दिनांक १३/०२/२०१९ च्या शासन ज्ञापनान्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

८. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त सद्भाव मंडप बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करुन घ्यावी. शासन निकषानुसार तसेच सद्भाव मंडप बांधकामाच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मंजुरीनुसार यासाठीच्या निविदा प्रक्रिया करुन कामास तात्काळ सुरुवात करावी व तसे शासनास अवगत करावे.

९. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त सद्भाव मंडप बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र+ राज्य हिश्यांतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून केवळ राष्ट्रीयीकृत बॅकेत ठेवण्यात यावा. सदर प्रयोजनासाठी राष्ट्रीयीकृत बॅकेत स्वतंत्र बॅक खाते उघडण्यात यावे.

१०. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

१२. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त सद्भाव मंडप बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रासह) संबंधीत अंमलबजावणी यंत्रणेने जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विकासकामांची माहिती व छायाचित्रे वेळोवेळी upload करावी.

१३. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१४/१२/२०१५ रोजीच्या बैठकीतील सूचनानुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमाअंतर्गत (PMJVK) ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करुन वितरित केला आहे, त्याच प्रयोजनार्थ सदर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनाकरिता सदर निधी खर्च केल्यास सर्व संबंधित अधिकाऱ्यांवर विनाविलंब कारवाई करण्यात येईल.

१४. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा)(कार्यक्रम) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा,

१५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि. ०२ एप्रिल, २०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील तसेच परिशिष्टातील अ.क्र.८ मधील तपाससुचीतील अ.क्र. १ ते १० मधील लागू अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. उपरोक्त केंद्र शासनाच्या हिश्यातील पहिला टप्प्यातील रु.२६.४० लाख इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबतची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१९०२१३१७२५५४६२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh
Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fde30534317da1ea9bdb3e7bec3c1084d5d608a86e993f8ac0fa02331b77751, serialNumber=b469b3fd61b5201f03b702c0f7fd0ec5cf18beb12425455f4856f44e3d4da763, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2019.02.13 17:27:35 +05'30'

**(सं.छ.तडवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.अ.मु.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२.प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३.विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
४.जिल्हाधिकारी,हिंगोली
५.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली,
६.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
७.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा) मुंबई/नागपूर.
८.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद
९.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड
१०.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, हिंगोली
११.जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
१२.वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१३.नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१४.निवड नस्ती, (का.७).